राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत **बारामती तालुका सहकारी दूध संघ मर्या., जि. पुणे** या संघास वेगवर्धक दुग्धविकास कार्यक्रम राबविण्यास व अर्थसहाय्यास मंजूरी देणेबाबत.................

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक राकृवि २०११ /प्र.क्र.२४९/पदुम-८**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक : २५ नोव्हेंबर, २०११**

**वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक एमएलके २०११/प्र.क्र.१७०/पदुम ८, दिनांक १६ जुलै, २०११**
**२) शासन निर्णय क्रमांक एमएलके २०११/प्र.क्र.१७०/पदुम-८,दिनांक १६ सप्टेंबर,२०११**

**प्रस्तावना :**

राज्यात दूध व्यवसायाला चालना देण्याच्या दृष्टीने पायाभूत सुविधा निर्माण करण्याची आवश्यकता असल्याने राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत दूध व्यवसाय करणा-या सहकारी संस्थांचे बळकटिकरण करण्याकरीता वेगवर्धक दुग्धविकास कार्यक्रम राबविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर कार्यक्रमांतर्गत **बारामती तालुका सहकारी दूध संघ मर्या., जि. पुणे** या संघाने सादर केलेल्या प्रकल्पास राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने दि.१६/८/२०११ च्या बैठकीत मंजूरी प्रदान केल्यानुसार संघाने सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालानुसार कार्यक्रम राबविण्यास व त्यास अर्थसहाय्य मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत वेगवर्धक दुग्धविकास कार्यक्रमा अंतर्गत **बारामती तालुका सहकारी दूध संघ मर्या., जि. पुणे** या संस्थेस रु.५१९.२९ लक्ष इतक्या रकमेचा प्रकल्प राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. यासाठी प्रकल्प राबविण्याकरीता रा.कृ.वि.हिस्सा रु.४१५.०० लक्ष इतका राहणार आहे व संघाचा हिस्सा रु.१०४.२९ लक्ष इतका राहील. सदर रकमेमधून संघाने सोबत जोडलेल्या **परिशिष्ट अ** मध्ये नमूद केलेल्या बाबींकरीता निधी मंजूर करण्यात येत आहे. त्यानुसार संघाने प्रकल्प राबविणे आवश्यक राहील.

२. **बारामती तालुका सहकारी दूध संघ मर्या., जि. पुणे** या संस्थेस प्रकल्प राबविण्यासाठी एकूण कार्यक्रमापैकी सन २०११-१२ मध्ये पहिला हप्ता रु.६०.०० लक्ष इतका निधी रा.कृ.वि.हिस्सा वितरीत करण्यात येत आहे. सदर वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संघाने आपला २०% हिस्सा म्हणजेच रु.१२.०० लक्ष इतका गुंतविणे आवश्यक राहील. मंजूर केलेल्या प्रकल्प किंमतीपेक्षा जास्तीचा होणारा खर्च हा संघाने स्वतः करणे आवश्यक राहील. त्याकरीता शासनामार्फत अतिरीक्त निधी मंजूर करण्यात येणार नाही.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी खर्च करण्याकरीता खालील अटी व शर्ती लागू राहतील. सदरहू खर्च हा संघाने प्रकल्प राबविण्यासाठी **परिशिष्ट "अ"** मध्ये दर्शविलेल्या बाबी व सादर केलेल्या प्रकल्प अहवालानुसारच खर्च करणे आवश्यक राहील.

३.१ संघाला मंजूर करण्यात आलेला निधी बाबत झालेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. तसेच लेखे हे जी.एफ.आर.नियम क्रमांक १४९ अन्वये विहित केलेल्या पध्दतीप्रमाणे ठेवावेत व झालेल्या खर्चाचा अहवाल आणि लेख्यांच्या संदर्भात झालेले लेखापरिक्षण या संबंधीची माहिती राज्य शासनास सादर करावी.

३.२ सहकारी संघाला जो निधी मंजूर करण्यात आलेला आहे त्या मंजूर निधीमधून सहकारी संघाला झालेली मिळकत (स्थावर /निमस्थावर) अशा सर्व मिळकतीचे लेखे लेखापरिक्षणास उपलब्ध करुन द्यावेत.

३.३ संघाला मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून झालेली मिळकतीत वाढ याची विल्हेवाट लावण्यापूर्वी शासनाची मान्यता घेतल्याशिवाय करता येणार नाही.

३.४ संघास उपलब्ध करुन दिलेल्या निधीप्रमाणे निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे आवश्यक राहील व मंजूर करण्यात आलेल्या निधीपैकी झालेला खर्च व अखर्चित असलेली रक्कम याची सविस्तर माहिती संघाने आयुक्त दुग्धव्यवसाय यांना सादर करणे आवश्यक राहील.

३.५ प्रस्तुत योजनेची यशस्वीरीत्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हयाच्या जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांची राहील व या योजनेसाठी प्रादेशिक स्तरावर प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी व राज्यस्तरावर आयुक्त दुग्धव्यवसाय विकास हे संनियंत्रण अधिकारी म्हणून राहतील.

३.६ शासना मार्फत वितरीत करण्यात येणा-या निधीच्या प्रमाणात संघाने आपला हिस्सा गुंतविणे आवश्यक राहील. सदर प्रकल्प उभारण्यासाठी रा.कृ.वि.हिस्सा व संघाचा हिस्सा यासाठी ठरलेल्या प्रमाणात खर्च व्हावा व प्रकल्प राबविण्यास अडचण येऊ नये यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी व संघाचे व्यवस्थापकीय संचालक यांचे संयुक्त खाते बँकेत उघडण्यात यावे. या संयुक्त खात्यामध्ये संघाच्या हिस्स्याची रक्कम ज्या प्रमाणात उपलब्ध होईल त्याच प्रमाणात या योजने अंतर्गत मंजूर असलेली तरतूद संबंधित संघास अदा करण्यापूर्वी प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी या योजनेसाठी संनियंत्रण अधिकारी असल्यामुळे त्यांची मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतरच जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांनी रक्कम बँकेतून आहरीत करुन संबंधित संघास कार्यक्रम राबविण्यासाठी अदा करावी.

३.७ या योजने अंतर्गत मंजूर करण्यात आलेला निधीचा विनियोग योग्यरीत्या न झाल्यास ती शासकीय नियमानुसार व्याजासहीत संबंधित संघाकडून वसूल करण्यात येईल.

३.८ सदर योजने अंतर्गत खरेदी करण्यात येणारे सर्व साहीत्य व उभारण्यात येणा-या प्रकल्पासाठी संघाने निविदा प्रक्रीयेचा अवलंब करावा.

३.९ या योजने अंतर्गत बसविण्यात येणा-या बल्क मिल्क कुलर, सचिव संगणक, मिल्क कॅन व इतर पुरवठा करण्यात येणा-या साहीत्यांवर तसेच योज ने अंतर्गत उभारण्यात येणा-या दुग्धशाळा व दूध प्रक्रीया प्रकल्पावर हा प्रकल्प **"राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत वेगवर्धक दुग्धविकास कार्यक्रम "** असे ठळकपणे दर्शनी भागावर नमूद करणे आवश्यक राहील.

४. संस्थेने सादर केलेल्या प्रकल्प अहवालानुसार राबविण्यात येत आहे किंवा नाही यासाठी योजनेची खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) संबंधित जिल्हयाचे जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी | -- अध्यक्ष |
| २) संघाचे अध्यक्ष | -- उपाध्यक्ष |
| ३) विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) | -- सदस्य |
| ४) संबंधित जिल्हयाचे जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी | -- सदस्य |
| ५) संबंधित जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन, उपआयुक्त | -- सदस्य |
| ६) आयुक्त दुग्धव्यवसाय कार्यालयातील एक अधिकारी (आयुक्त नेमणूक करतील असा एक अधिकारी) | -- सदस्य |
| ७) संबंधित संघाचे व्यवस्थापकीय संचालक | -- सदस्य सचिव |

५. प्रस्तूत योजने अंतर्गत संबंधित संस्थेमार्फत शेतक-यांना देण्यात येणा-या प्रशिक्षणासंदर्भात प्रशिक्षण हे नामांकित संस्थेकडून द्यावे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

(सु.तु. शेंडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

प्रति,

सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई-४०० ०१८
प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे विभाग, पुणे
विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) पुणे विभाग, पुणे
जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे
दुग्धशाळा व्यवस्थापक, शासकीय दूध योजना, पुणे
जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, पुणे
जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, पुणे
व्यवस्थापकीय संचालक बारामती तालुका सहकारी दूध संघ मर्या., जि. पुणे
महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
निवड नस्ती

परिशिष्ट "अ" (रुपये)

बारामती तालुका सहकारी दूध उत्पादक संघ मर्या., बारामती, जि.पुणे यांना राष्ट्रीय कृषि विकास योजने मधून मंजूर कार्यक्रम

| अनु.क्र. | बाब | तपशिल | एकूण नग | एकूण रक्कम | रा.कृ.वि.हिस्सा ८०% | संघ हिस्सा २०% |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | बल्क मिल्क कुलर | ५०० लि.क्षमता | ५ | ३५००००० | २८००००० | ७००००० |
| | | १०००० लि.क्षमता | ३० | २२५००००० | १८०००००० | ४५००००० |
| २ | संगणक सचिव (AMCU) | | ११२ | १४०००००० | ११२००००० | २८००००० |
| ३ | दूध तपासणी संच | | १२७ | ३१७५००० | २५४०००० | ६३५००० |
| ४ | मिल्क कॅन | ४० लि. क्षमता | ११२ | १२५४००० | १०००००० | २५४००० |
| ५ | प्रशिक्षण | ३ दिवस (शेतकरी प्रशिक्षण) | ५९५० शेतकरी (२५० प्र.दि.) | ४४६२५०० | ३५३०००० | ९३२५०० |
| | | स्वच्छ दूध उत्पादन प्रशिक्षण | २ दिवस रु.१५०/- प्र.दि.१७९२ सभासद | ५३७५०० | ४३०००० | १०७५०० |
| ६ | व्यवस्थापन सहाय्य | | ११२ प्राथमिक दूध संस्था | २५००००० | २०००००० | ५००००० |
| | **एकूण मंजूर रक्कम** | | | **५११९२९०००** | **४१५०००००** | **१०४२९०००** |